अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१८-२०१९
सन २०१७-१८ करिता तालुका स्मार्ट ग्राम
निवडलेल्या ग्राम पंचायतींना निधी वितरीत
करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१८/प्र.क्र.३४५/योजना-११

बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक : ०७ जानेवारी, २०१९

**वाचा :**

**१) शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१६/प्र.क्र.१५३/योजना-१, दि.२१.११.२०१६**
**२) वित्त विभाग, शासन परिपत्रक : क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२.४.२०१८.**
**३) शासन निर्णय क्रमांक स्माग्रायो-२०१८/प्र.क्र.१४१/योजना-११, दिनांक ८.६.२०१८.**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय क्र.स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१/अ/योजना-१, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१६ अन्वये, स्मार्ट ग्राम योजनेसाठी सन २०१७-१८ मध्ये प्रथम स्तरावरील तालुका स्मार्ट ग्राम ग्रामपंचायतींना रोख स्वरुपात पारितोषिक वितरण करण्यात येईल अशी तरतूद आहे. त्यानुषंगाने, सन २०१७-१८ करिता राज्यातील ३५१ तालुका स्मार्ट ग्राम ग्रामपंचायतींना पुरस्कार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

राज्यातील ३५१ तालुका स्मार्ट ग्राम व ३४ जिल्हा स्मार्ट ग्राम म्हणून निवड झालेल्या ग्रामपंचायतीना अनुक्रमे रुपये १०.०० लक्ष व रुपये ४०.०० लक्ष अशी पारितोषिकांची रक्कम अदा करण्यात येते. या योजनेकरिता सन २०१८-१९ मध्ये मागणी क्रमांक-एल-३-२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) स्मार्ट ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी पंचायत राज संस्थाना अनुदान (२५१५ १६७७) (योजनांतर्गत / दत्तमत्त)-३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रुपये ५३,८०,००,०००/-इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली होती. त्यापैकी रुपये ३७,६६,००,०००/-इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे (BDS) वर उपलब्ध करुन देण्यात आला होता. त्यापैकी दिनांक ८.६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, ३४ जिल्हा स्मार्ट ग्रामपंचायतींना प्रत्येकी रुपये ४०.०० लक्ष असे एकूण रुपये १३,६०,००,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला असून रुपये २४,०६,००,०००/- इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) शिल्लक आहे.

२. शासन निर्णय क्र.स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१/अ/योजना-१, दिनांक २१.११.२०१६ मधील परिशिष्ट-ब नुसार स्मार्ट ग्राम योजनेसाठी प्रथम स्तरावरील तालुका स्मार्ट ग्रामपंचायतींना रोख स्वरुपात पारितोषिक वितरण करणे आवश्यक आहे. त्यानुसार सन २०१७-१८ मध्ये राज्यातील ३५१ तालुका स्मार्ट ग्राम म्हणून निवड होणाऱ्या

ग्रामपंचायतीना प्रत्येकी रुपये ६.८५ लक्ष याप्रमाणे रुपये २४,०४,३५,०००/- (रुपये चोवीस कोटी चार लक्ष पस्तीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. वरिल प्रमाणे, सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे (BDS) खालील प्रमाणे जिल्हा परिषदांना निधीचे वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | तालुका स्मार्ट ग्राम निवडलेल्या ग्रामपंचायतींची संख्या | वितरीत निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | ५ | ३४.२५ |
| २ | पालघर | ८ | ५४.८० |
| ३ | रायगड | १५ | १०२.७५ |
| ४ | रत्नागिरी | ९ | ६१.६५ |
| ५ | सिंधुदुर्ग | ८ | ५४.८० |
| | **एकूण कोकण विभाग** | **४५** | **३०८.२५** |
| ६ | पुणे | १३ | ८९.०५ |
| ७ | सातारा | ११ | ७५.३५ |
| ८ | सांगली | १० | ६८.५० |
| ९ | सोलापूर | ११ | ७५.३५ |
| १० | कोल्हापूर | १२ | ८२.२२ |
| | **एकूण पूणे विभाग** | **५७** | **३९०.४५** |
| ११ | नाशिक | १५ | १०२.७५ |
| १२ | धुळे | ४ | २७.४० |
| १३ | नंदुरबार | ६ | ४१.१० |
| १४ | जळगांव | १५ | १०२.७५ |
| १५ | अहमदनगर | १४ | ९५.९० |
| | **एकूण नाशिक विभाग** | **५४** | **३६९.९०** |
| १६ | औरंगाबाद | ९ | ६१.६५ |
| १७ | परभणी | ९ | ६१.६५ |
| १८ | उस्मानाबाद | ८ | ५४.८० |
| १९ | नांदेड | १६ | १०९.६० |
| २० | बीड | ११ | ७५.३५ |
| २१ | जालना | ८ | ५४.८० |
| २२ | लातूर | १० | ६८.५० |
| २३ | हिंगोली | ५ | ३४.२५ |
| | **एकूण औरंगाबाद विभाग** | **७६** | **५२०.६०** |

| अ.क्र. | जिल्हा | तालुका स्मार्ट ग्राम निवडलेल्या ग्रामपंचायतींची संख्या | वितरीत निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| २४ | अमरावती | १४ | ९५.९० |
| २५ | अकोला | ७ | ४७.९५ |
| २६ | यवतमाळ | १६ | १०९.६० |
| २७ | बुलढाणा | १३ | ५९.०५ |
| २८ | वाशिम | ६ | ४१.१० |
| | **एकूण अमरावती विभाग** | **५६** | **३८३.६०** |
| २९ | नागपूर | १३ | ८९.०५ |
| ३० | वर्धा | ८ | ५४.८० |
| ३१ | चंद्रपुर | १५ | १०२.७५ |
| ३२ | गडचिरोली | १२ | २०.२० |
| ३३ | भंडारा | ७ | ४७.९५ |
| ३४ | गोंदिया | ८ | ५४.८० |
| | **एकूण नागपूर विभाग** | **६३** | **४३१.५५** |
| | **एकूण ग्रामपंचायती -** | **३५१** | **२४०४.३५** |

५. सदर निधी वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यानी वितरीत करावयाच्या रकमा कोषागारातून काढुन संबंधितांना प्रदान करण्याची व्यवस्था करावी. सदर निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी तालुका स्मार्ट ग्रामपंचायतींना पारितोषिकांचा निधी वितरीत केल्यानंतर संबंधित ग्रामपंचायतीमार्फत नाविण्यापूर्ण विकास कामासाठी खर्च केला आहे याबाबतची माहिती तातडीने सादर करावी.

६. शासन निर्णय क्रमांक-स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-११, दिनांक १६.४.२०१८ मधील तरतुदन्वये, नाविण्यपूर्ण कामाऐवजी अन्य विकास कामे ज्या स्मार्ट ग्रामपंचायतींना पूर्ण करावयाची आहे अशा विकास कामाकरिता शासनाची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

७. नियंत्रण अधिकाऱ्यांनी या योजनेकरिता झालेल्या /होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घेऊन प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयास झालेला खर्च यामध्ये तफावर राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी.

८. सदरील खर्च सन २०१८-१९ करिता लेखाशिर्ष मागणी क्रमांक-एल-३-२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) स्मार्ट ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी पंचायत राज संस्थाना अनुदान (२५१५ १६७७) (योजनांतर्गत / दत्तमत्त)-३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२.४.२०१८ अन्वये दिलेल्या सूचनानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201901071311517520 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Uttam Rathod

Digitally signed by Subhash Uttam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development and water Conser Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4900ceadef378ce6953fc366d818c664ad0c54be36d6234bdc213e86d85816c2, cn=Subhash Uttam Rathod
Date: 2019.01.08 12:02:17 +05'30'

**सुभाष राठोड**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२,नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. विभागीय आयुक्त,कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
५. (सर्व) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
६. (सर्व) जिल्हा कोषागार अधिकारी.
७. (सर्व) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद.
८. सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत).
९. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१५),मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कक्ष अधिकारी (वित्त -१) ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
११.निवड नस्ती (योजना-११).